भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील
“वरिष्ठ भूवैज्ञानिक” संवर्गातील
अधिकाऱ्यांच्या बदल्या- २०१७

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन आदेश क्रमांकः आपना-०२१७/प्र.क्र. ३९/पापु-१५

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल, नवीन मंत्रालय इमारत,
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुबई ४०० ००१
तारीख: १२ मे, २०१७

**शासन आदेश -**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ अन्वये भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील वरिष्ठ भूवैज्ञानिक संवर्गातील अधिकाऱ्यांच्या प्रशासकीय कारणास्तव बदल्या करण्यात येत असून त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक ४ मध्ये दर्शविलेल्या कार्यालयात त्यांची बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | वरिष्ठ भूवैज्ञानिकाचे नाव | सध्याचे कार्यालय | बदलीनंतरचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. बी.एस.मेश्राम | वरिष्ठ भूवैज्ञानिक, बीड | वरिष्ठ भूवैज्ञानिक, जालना |
| २ | श्री. एस.टी.पद्मने | वरिष्ठ भूवैज्ञानिक, नागपूर | वरिष्ठ भूवैज्ञानिक, भंडारा |
| ३ | श्री. व्ही.आर.भुसारी | वरिष्ठ भूवैज्ञानिक, भंडारा | वरिष्ठ भूवैज्ञानिक, वर्धा |
| ४ | श्री. बी.आर.टोणपे | संचालनालय, पुणे | वरिष्ठ भूवैज्ञानिक, सातारा |
| ५ | श्री. पी.एस.झरे | संचालनालय, पुणे | वरिष्ठ भूवैज्ञानिक, बीड |
| ६ | श्री. आर.टी.शेलार | उपसंचालक, पुणे | वरिष्ठ भूवैज्ञानिक, हिंगोली |
| ७ | श्रीमती व्ही.पी.माने | वरिष्ठ भूवैज्ञानिक, औरंगाबाद | वरिष्ठ भूवैज्ञानिक, नागपूर |
| ८ | श्री. पी.एम.शेलार | वरिष्ठ भूवैज्ञानिक, जालना | वरिष्ठ भूवैज्ञानिक, औरंगाबाद |
| ९ | श्री. बी.एम.ठाकूर | वरिष्ठ भूवैज्ञानिक, रायगड | वरिष्ठ भूवैज्ञानिक, गोंदिया |

बदली आदेशाची तात्काळ व कार्यक्षमरित्या अंमलबजावणी होण्याकरीता खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

१. बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर सर्व कार्यालय प्रमुखांनी पर्यायी अधिकारी हजर होण्याची वाट न पाहता बदली झालेल्या अधिकाऱ्यांना दिनांक ३१ मे, २०१७ (मध्यान्होनंतर) पर्यंत कार्यमुक्त करावे.
२. बदली झालेले अधिकारी त्यांच्या संबंधित कार्यालयातून कार्यमुक्त होऊन रूजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रूजू करून घ्यावे. एखाद्या अधिकाऱ्याला रूजू करून न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतिक्षाधीन काळ ठरवून काम न देता वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित कार्यालय प्रमुखास व आस्थापना अधिकाऱ्यास जबाबदार धरण्यात येईल.
३. बदली आदेशात बदल करून घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील.
४. सदर बदल्यांची अंमलबजावणी प्रभावीपणे होणे गरजेचे असल्यामुळे बदली झालेल्या सर्व अधिकाऱ्यांच्या कार्यमुक्ततेच्या दिनांकापर्यंत किंवा दिनांक ३१ मे, २०१७ पर्यंतचे वेतन ते सध्या कार्यरत असलेल्या कार्यालयाने काढावे. दि. १ जून, २०१७ पासूनचे वेतन कोणत्याही परिस्थितीत बदलीपुर्वीच्या कार्यालयाकडून काढण्यात येऊ नये. सदर वेतन संबंधित अधिकारी बदलीच्या कार्यालयात हजर झाल्यानंतर बदली नंतरच्या कार्यालयाने काढावे व तसा अहवाल शासनास सादर करावा. दि. १ जून, २०१७ पासूनचे वेतन बदलीपुर्वी कार्यरत असलेल्या कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकाऱ्याने अदा केल्यास त्यांना व्यक्तिशः जबाबदार धरण्यात येईल, अशा सूचना भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील सर्व विभागप्रमुख व कार्यालय प्रमुखांना देण्यात येत आहेत.

हे आदेश तात्काळ अंमलात येतील. बदली झालेल्या संबंधित अधिकाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त करून ते बदली झालेल्या कार्यालयात रूजू झाले आहेत किंवा कसे, याची माहिती तात्काळ शासनास सादर करण्याबाबत संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांना सूचित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक 201705121551321828 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Bhagwan Sawant

Digitally signed by Mahesh Bhagwan Sawant
DN: CN = Mahesh Bhagwan Sawant, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2017.05.12 17:05:55 +05'30'

**(महेश सावंत)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. सर्व संबंधित वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा

**प्रत-**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजीनगर, पुणे
५. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नागपूर, अमरावती, औरंगाबाद,नाशिक, पुणे, कोकण.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, संबंधित सर्व जिल्हे.
७. निवडनस्ती कार्यासन, पापु-१५